राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत शाश्वततेंतर्गत सौर ऊर्जा पंपाचा वापर करुन विंधण विहिरीवर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजना राज्यात राबविण्याबाबत.

**आदिवासी व अतिदुर्गम भागासाठी योजनेच्या निकषात बदल**

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.३८७/पापु-१५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-२४ जानेवारी, २०११

वाचा: १. पा.पु.व स्व.विभाग, शासन निर्णय क्र. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.०४/पापु-१५, दिनांक ११ जानेवारी, २०१०.
२. पा.पु.व स्व.विभाग,शासन निर्णय क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च,२०१०.
३. पा.पु.व स्व.विभाग,शासन निर्णय क्र. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.२१७/पापु-१५, दिनांक २१ ऑगस्ट,२०१०.

**प्रस्तावना** :-

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने अस्तित्त्वात असलेल्या उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर दुहेरी पंप व्यवस्थेवर आधारित लघु नळ पाणी पुरवठा योजना विकसित केली असून वीज पुरवठा उपलब्ध नसलेल्या गाव/वाड्या/वस्त्यांतील उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर सौर ऊर्जा पंप बसवून सदर योजना संपूर्ण राज्यात राबविण्यास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

राज्यातील नंदूरबार, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या पाच जिल्हयातील आदिवासी भागातील आणि अतिदुर्गम भागातील ग्रामीण जनतेस शाश्वत पाणी पुरवठा उपलब्ध करुन देण्यासाठी सौर ऊर्जेवर आधारीत लघु नळ पाणी पुरवठा योजनेच्या गाव निवडीच्या निकषात बदल करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय** :-

राज्यातील नंदूरबार, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या पाच जिल्हयातील आदिवासी भागातील आणि अतिदुर्गम भागातील ग्रामीण जनतेस शाश्वत पाणी पुरवठा उपलब्ध करुन देण्यासाठी सौर ऊर्जेवर आधारीत लघु नळ पाणी पुरवठा योजनेच्या गाव निवडीच्या निकषात खालील प्रमाणे बदल करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

***राज्यातील नंदूरबार, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या जिल्हयात योजनेच्या अंमलबजावणीसाठी सुधारीत मार्गदर्शक तत्वे :-***

वाडी-वस्तीच्या निवडीचे निकष : -१) ज्या वाड्या / वस्त्या पिण्याच्या पाण्यासाठी केवळ विंधण विहिरीवर आधारीत आहेत आणि अशा विधंण विहिरीची क्षमता २८०० लिटर्स प्रती तास असेल, अशा वाड्या/

वस्त्यांमध्ये वीज पुरवठा उपलब्ध नसेल किंवा शाश्वत वीज पुरवठा उपलब्ध होत नसेल अशा वाडया/वस्त्यांची या योजनेसाठी निवड प्राथम्याने करण्यात यावी.

२) ज्या गावांच्या गावठाणामध्ये नळ पाणी पुरवठा योजना आहेत परंतू गावठाणामधील काही भाग/वाडया- वस्त्यांना मात्र त्याद्वारे बारमाही शाश्वत पाणी पुरवठा उपलब्ध होत नाही असा भाग / अशा वाडया-वस्त्यांमध्ये २८०० लिटर्स प्रती तास क्षमता असणारी विंधण विहिर अस्तित्वात असले व या भागास वाडया/वस्त्यास वीज पुरवठा उपलब्ध नसेल अथवा विंधण विहिरींच्या नजीक वीज पुरवठा नसेल अशा वाडया/वस्त्या किंवा पंप चालविण्यासाठी शाश्वत वीज पुरवठा उपलब्ध होत नसेल असा भाग /- अशा वाडया- वस्त्या.

३) भौगोलिक परिस्थितीमुळे वीज पुरवठा किफायतशीर नसेल अशा वाडया वस्त्या.

२. वरील मार्गदर्शक सूचना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील. मात्र ज्या ठिकाणी प्रायोगिक तत्वावर अशा योजनांची कामे सुरु केली असून योजना प्रगतीपथावर आहेत, अशा योजनांदेखील याच धोरणाच्या आधारे पूर्ण कराव्यात. तसेच वरील निकष वगळता अन्य बाबीसाठी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयानुसार निश्चित केलेली मानके व कार्यपध्दती कायम राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahaashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र.२०११०१२४२०४५३८००१ असा आहे.

*महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,*

*-सही-*
*(सु. वि. कोळेकर)*
*उप सचिव, महाराष्ट्र शासन*

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व
२) जिल्हाधिकारी (सर्व)
३) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५) सह संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
६) सह संचालक (अभि.) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
७) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
८) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
९) मुख्य खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे / नागपूर
१०) वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
११) उप अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परिषद सर्व.
१२) सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
१४) निवड नस्ती